**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा अभियान या योजनेकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीताचा निधी सन २०२०-२१ मध्ये वितरीत करण्याबाबत. (लेखाशीर्ष २२०२ आय६४८, २२०२ आय६५७).**

**महाराष्ट्र शासन.**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०४ / का-६.

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक: १ जून, २०२०.

<u>वाचा -</u>

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.एसएसए-२०१९/प्र.क्र.१११(भाग-४)/एस.डी.१.

**शासन निर्णय-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात शालेय शिक्षण व क्रीडा विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या समग्र शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता मागणी क्र.टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण ,०१-प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१०)-समग्र शिक्षा अभियान (६० टक्के केंद्र हिस्सा) लेखाशीर्ष २२०२ आय ६४८, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रू.१७५००.०० लाख तरतूद अर्थसंकल्पित आहे. तसेच या योजनेच्या समरूप ४० टक्के राज्य हिश्श्याच्या लेखाशीर्ष २२०२ आय ६५७, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रू.१००००.०० लाख तरतूद अर्थसंकल्पित आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १६ एप्रिल,२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता (जून, २०२० अखेर) अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत ठराविक उद्दीष्टांसाठी निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्या मागील वर्षामधील निधी वितरणाकरीता वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य केले आहे. या अनुषंगाने शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरून (०१) (१०)-समग्र शिक्षा अभियान (६० टक्के केंद्र हिस्सा) लेखाशीर्ष २२०२ आय ६४८, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रू.१६६.१३ लाख तसेच समरूप ४० टक्के राज्य हिश्श्याच्या लेखाशीर्ष २२०२ आय ६५७, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रू.११०.७५ लाख इतका सन २०१९-२० करीताचा निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास;

आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाने दि.१९.०५.२०२० च्या टिप्पणीन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५०५१५३२०५८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.06.01 16:01:14 +05'30'

**(किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
७. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.